राज्यातील एकात्मिक वस्त्रोद्योग संकुलांना अर्थसहाय्य मंजूर करणेबाबत. (हिंगणघाट इंटिग्रटेड टेक्सटाईल पार्क प्रा.लि. हिंगणघाट,जि. वर्धा)

**महाराष्ट्र शासन**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

शासन निर्णय क्र. टेक्सपा-२०१६/प्र.क्र.०८/टेक्स-४

नवीन प्रशासकीय भवन, १४ वा मजला,

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- १५ मार्च, २०२४

**वाचा :-**

१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक. टेक्सपा-२०११/प्र.क्र.९८/टेक्स-४ दिनांक २५ मे २०१२

२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक. टेक्सपा-०१६/प्र.क्र.०८/टेक्स-४ दिनांक २३ मार्च २०१६

३) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक. टेक्सपा-२०१६/प्र.क्र.०८/टेक्स-४ दिनांक ०७ फेब्रुवारी २०२३

४) आयुक्त, वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांचे पत्र क्रमांक: कार्य/४/हिंगणघाट/SITP/२nd,3rd,4th/२०२२ दि.१२-०९-२०२२

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत एकात्मिक वस्त्रोद्योग संकुल योजना सन २००५-०६ या वर्षापासून अंमलात आली आहे. सदर योजनेंतर्गत एकात्मिक वस्त्रोद्योग संकुलांना प्रकल्प किंमतीच्या ४०% किंवा रु.४०.०० कोटी यापैकी जी रक्कम कमी असेल तेवढे अर्थसहाय्य ४ टप्यात मंजूर करण्यात येते. या योजनेंतर्गत राज्यात मंजूर झालेल्या व भविष्यात मंजूर होणा-या एकात्मिक वस्त्रोद्योग संकूलांना प्रकल्प किंमतीच्या ९% किंवा रु.९.०० कोटी यापैकी जी रक्कम कमी असेल तेवढे अनुदान देण्याची योजना संदर्भीय दि.२५ मे, २०१२ च्या शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आली आहे. केंद्र शासन त्यांच्या हिश्याच्या अर्थसहाय्याची रक्कम ज्या प्रमाणात मंजूर करेल त्या प्रमाणात राज्य शासनाच्या हिश्याच्या अर्थसहाय्याची रक्कम मंजूर करण्यात येईल, अशी उपरोक्त शासन निर्णयात तरतूद आहे. केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत हिंगणघाट इंटिग्रटेड टेक्स्टाईल पार्क प्रा.लि.हिंगणघाट, जि. वर्धा या वस्त्रोद्योग संकुलास केंद्र शासनाने आतापर्यत एकूण रु.३०.०० कोटी अर्थसहाय्य प्राप्त झाले आहे. त्याप्रमाणात राज्य शासनाकडून देय असलेल्या रु.६७५.०० लाख अर्थसहाय्यामधून आतापर्यंत रु.१९५.०० लाख अर्थसहाय्य वितरीत करण्यात आले आहे. उर्वरीत देय असलेले रु.४८०.०० लाख त्या पैकी रु.४३०.०० लाख इतके अर्थसहाय्य मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने दि. ४ जानेवारी २०१९ रोजीच्या पत्रान्वये हिंगणघाट इंटिग्रेटेड टेक्सटाईल पार्क प्रा. लि. हिंगणघाट, जि. वर्धा या वस्त्रोद्योग संकुलाच्या रू. १०८.३९ कोटी इतक्या प्रकल्प अहवालास मान्यता दिलेली आहे. केंद्र पुरस्कृत एकात्मिक वस्त्रोद्योग संकुल योजनेंतर्गत अनुदान देण्याची योजना संदर्भीय क्र.१ येथे नमूद दि.२५ मे, २०१२ च्या शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आली आहे. सदर वस्त्रोद्योग संकुलास केंद्र शासनाच्या हिश्यापोटीचे आतापर्यंत एकूण रु.३०.०० कोटी अर्थसहाय्य प्राप्त झाले आहे. त्या प्रमाणात राज्य शासनाच्या हिश्यापोटीचे एकूण रु.६७५.०० लाख देय आहे. त्यापैकी संदर्भीय क्र.२ येथे नमूद दि.२३-०३-२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.९०.०० लाख इतके अर्थसहाय्य आणि संदर्भीय क्र.३ येथे नमूद दि.०७/०२/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.१०५.०० लाख इतके अर्थसहाय्य वितरीत करण्यात आले आहे.

केंद्र पुरस्कृत एकात्मिक वस्त्रोद्योग संकुल योजनेंतर्गत अनुदान मंजूर करण्यासाठी २८५१ ५२६४ या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता सुधारित अंदाजानुसार रु.४९०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित झाला आहे. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात सदर लेखाशीर्षाखाली आतापर्यंत "निरंक" इतका खर्च झाला आहे. शासन निर्णय दि.२५ मे, २०१२ मध्ये नमूद सर्व अटी व तरतूदी यांचे तंतोतंत पालन सदर वस्त्रोद्योग संकुलाने केले आहे. याची शहानिशा आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी करण्याच्या अटीवर हिंगणघाट इंटिग्रेटेड टेक्सटाईल पार्क प्रा. लि. हिंगणघाट, जि. वर्धा या वस्त्रोद्योग संकुलास रु.४३०.०० लाख (रुपये चार कोटी तीस लाख फक्त) इतके अर्थसहाय्य मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर अर्थसहाय्य शासनाने भविष्यात आणखी काही अटी व शर्ती निश्चित केल्यास अशा अतिरिक्त अटी व शर्ती सदर वस्त्रोद्योग संकुलास लागू राहतील या मुद्दयाच्या अधीन राहून तसेच खाली नमूद केलेल्या अतिरिक्त अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे:-

अटी व शर्ती :-

अ) राज्य शासनाकडून मंजूर होणारा निधी संबंधीत वस्त्रोद्योगाच्या नावे एक दुय्यम खाते (Subsidiary Account) उघडून त्यामध्ये जमा करण्यात यावा.

ब) केंद्र शासनाने त्यांच्या एकात्मिक वस्त्रोद्योग संकुल योजनेंतर्गत प्रकल्प उभारणी व निधीवरील नियंत्रणासाठी स्पेशल परपज व्हेइकल (SPV) प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार (PMC) यांची जी जबाबदारी निश्चित केली आहे ती जबाबदारी राज्य शासनाने वितरीत केलेल्या निधी संदर्भातही राहील. याशिवाय राज्य शासनाने मंजूर केलेल्या निधीच्या वापराबाबत SPV व PMC यांचेबरोबर आयुक्त वस्त्रोद्योग यांची देखील जबाबदारी राहील.

क) केंद्र शासनाने एकात्मिक वस्त्रोद्योग संकुल योजनेच्या अंमलबजावणीसाठी निर्धारीत केलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार निधीचे विनियोजन करण्यासंदर्भात बंधपत्र लिहून देण्याची अट घालण्यात आली आहे. त्याप्रमाणे राज्य शासनाच्या हिश्याच्या निधी विनियोजनाबाबत बंधपत्र लिहून देण्याची जबाबदारी संकुलाच्या स्पेशल परपज व्हेइकल (SPV) ची राहील, तसेच बंधपत्र लिहून घेण्याची आयुक्त ,वस्त्रोद्योग ,महाराष्ट्र शासन यांची राहील.

ड) संकुलांना राज्य शासनामार्फत वितरीत केलेल्या अर्थसहाय्याचा योग्य विनियोग होत आहे किंवा कसे याबाबत महालेखापाल यांचेकडून लेखापरिक्षण करण्यात येईल. सदर लेखापरिक्षणासाठी आवश्यक दस्तऐवज महालेखापालांना उपलब्ध करुन देणे प्रवर्तकावर बंधनकारक राहील.

३.	वित्त विभाग, परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२-०४-२०२३ सोबतच्या परिशिष्ठातील अ.क्र. ९ येथील "३३-अर्थसहाय्य" या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत. सदर अ.क्र.१ मधील तपासणी सूचीतील क्र.६, ७, १० मधील तरतूदी या प्रकरणी लागू होत नाहीत, तर क्र. १, २, ३, ४, ५, ८, ९ मधील तरतूदी या प्रकरणी लागू असून सदर तरतुदींची पूर्तता या प्रकरणी होत आहे.

४.	वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१० मे, २०१६ मधील परिच्छेद- अ नुसार ५, ६, ८, ९, १० मधील तरतूदी या प्रकरणी लागू होत नाहीत. तर क्र.१, २, ३, ४, ७. मधील बाबींची पूर्तता खालीलप्रमाणे करण्यात आली आहे:-

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार:- वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि.१२-०४-२०२३ नुसार ३३- अर्थसहाय्य" या बाबीखालील सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता झाले आहेत सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

२) मंजूर निधी:- "मागणी क्र. व्ही- २, २८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था (०२) (६०) वस्त्रोद्योग संकुल उभारणे (केंद्र योजना) (कार्यक्रम) ३३. अर्थसहाय्य (२८५१ ५२६४)" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात सुधारित अंदाजान्वये प्राप्त तरतूद रु.४९०.०० लाख निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे:-
मागील ३ महिन्यापूर्वी कोणतेही अनुदान वितरीत करण्यात आलेले नाही.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे, त्या लेखाशीर्षातर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही:- सदर लेखाशीर्षाखाली एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे:- लागू नाही.

६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे:- लागू नाही.

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिका-याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा:- केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार वस्त्रोद्योग संकुल योजना राबविण्यात येते.

८) अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रीतसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत:- लागू नाही.

९) खरेदी विषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा:- लागू नाही.

१०) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी:- लागू नाही.

५.	या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या रु.४३०.०० लाख (रूपये चार कोटी तीस लाख फक्त) इतक्या अनुदानाचा खर्च "मागणी क्र.व्ही-२, २८५१- ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था (०२) (६०) वस्त्रोद्योग संकुल उभारणे (केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) ३३, अर्थसहाय्य (२८५१ ५२६४)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध झालेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६.	या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली रू.४३०.०० लाख ( रु.चार कोटी तीस लाख) इतकी रक्कम हिंगणघाट इंटिग्रेटेड टेक्सटाईल पार्क प्रा. लि. हिंगणघाट, जि. वर्धा (HINANGHAT INTEGREATED TEXTILE PARK PYT, LTD, HINGANGHAT DIST VARDHA) या वस्त्रोद्योग संकुलाच्या नावाने अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन व वस्त्रोद्योग संकुलाच्या Bank of Baroda Civil Lane Nagpur Branch या बँकेतील खाते क्र. ७३१३०२०००००२३५ द्वारे वितरित करण्याची कार्यवाही करण्याकरीता श्री.सु.पु.पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२ यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणुन घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्रीम. श्रद्धा कोचरेकर ,उप सचिव (रेशीम), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०००३२ यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणुन घोषित करण्यात येत आहे.

७.	सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या दि.१२-०४-२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये विभागास दिलेल्या अधिकारानुसार तसेच नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ १४०/२०२४/व्यय-२ दि.०४-०३-२०२४ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५२१२६०५१७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANJUM BANO RASHIDKHAN PATHAN

Digitally signed by ANJUM BANO RASHIDKHAN PATHAN
DN: CN = ANJUM BANO RASHIDKHAN PATHAN, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = CO-OPERATIVE MARKETING AND TEXTILE DEPARTMENT
Date: 2024.03.15 21:36:55 +05'30'

**(अंजुम पठाण)**
**कक्ष अधिकारी महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (वस्त्रोद्योग), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
२. सचिव (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक,
३. उप सचिव (रेशीम), वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक,
४. उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग यांचे स्वीय सहायक,
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर,
६. महालेखापाल,(लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर,
७. कार्यासन अधिकारी (व्यय-२/अर्थसंकल्प-१२/अर्थसंकल्प-१३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. कार्यासन अधिकारी (कार्यासन-१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९ . आयुक्त, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
१०. प्रादेशिक उप आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर,
११. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१३. कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. अध्यक्ष / चेअरमन हिंगणघाट इंटिग्रटेड टेक्स्टाईल पार्क प्रा.लि.हिंगणघाट, जि. वर्धा
१६. निवडनस्ती (टेक्स-४).